"एम.एस्सी.नर्सिंग" हा २४ महिन्याचा अभ्यासक्रम पूर्ण करण्यासाठी सन २०१८-२० या शैक्षणिक वर्षासाठी अध्ययन रजा मंजूर करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**
**शासन ज्ञापन क्र. : अध्यर २०१७/प्र.क्र.५६/परिचर्या**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार (७ वा मजला),
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : ०६ ऑगस्ट, २०१८.

**वाचा :-**
१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. सेनिवे/१००१/१३०/सेवा-४, दि. २.६.२००३
२) शासन समक्रमांक दि.०३.०५.२०१८ चे पूरकपत्र.
३) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे क्र.संवैशिवसं/एनयुआर/एमएस्सी (न.)/खाजगी/प्रवेश/धुरी/३/ई/१२५८१-८४/२०१८,दि. १७.११.२०१७
४) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे क्र.संवैशिवसं /एनयुआर/अरजा/एमएस्सी./खाजगी/धुरी/६/ई/५६३७/२०१८, दि. १२.०६.२०१८

**प्रस्तावना :-**

म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम ८० ते ८३ मध्ये शासकीय कर्मचाऱ्यांना त्यांच्या कर्तव्य क्षेत्राशी प्रत्यक्ष व निकट संबंध असलेल्या व्यवसाय विषयातील अथवा तांत्रिक विषयातील उच्च शिक्षण अथवा विशेषीकृत प्रशिक्षण अंतर्भूत असलेला विशेष पाठ्यक्रम भारतामध्ये वा भारताबाहेर पूर्ण करण्यासाठी लोकसेवेची निकड लक्षात घेऊन अध्ययन रजा मंजूर करण्याची तरतूद आहे.

२. तद्नुसार क्षेत्रीय कार्यालयातील तसेच त्यांच्या अधिनस्त असलेल्या कार्यालयातील अधिकारी/कर्मचारी यांना वर नमूद केलेल्या क्षेत्राशी निगडीत अभ्यासक्रम पूर्ण करण्यासाठी अध्ययन रजा मंजूर करण्याचे अधिकार शासनास असल्याने, सदर अभ्यासक्रम चालू होण्यापूर्वी आगाऊ वेळेत यथायोग्य प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करुन त्या अनुषंगाने यथोचित शासन आदेश निर्गमित होणे क्रमप्राप्त आहे.

३. संदर्भाधीन पूरकपत्रान्वये परिचर्या प्रवर्गात कार्यरत कर्मचाऱ्यांना शासकीय परिचर्या शिक्षण संस्थेतील जागांवर काही कारणाने प्रवेश न मिळता खासगी नर्सिंग संस्थांमध्ये प्रवेश मिळाल्यास सदर सेवांतर्गत कर्मचाऱ्यांना अध्ययन रजा अनुज्ञेय ठरेल. मात्र संबंधित कर्मचाऱ्याने शासकीय नर्सिंग संस्थामधील राखीव जागांसाठीच्या प्रवेश प्रक्रियेत भाग घेतलेला असावा. या अटीच्या अधीन राहून खाजगी नर्सिं संस्थांमध्ये प्रवेश घेतलेल्या कर्मचाऱ्यांना अध्ययन रजा मंजूर करण्याबाबतची तरतूद केली आहे.

४. तद्नुसार, संचालक यांचे पत्र दिनांक १२.०६.२०१८ अन्वये “एम.एस्सी.नर्सिंग” या अभ्यासक्रमासाठी श्रीमती निता शामसुंदर धुरी, अधिपरिचारीका, ज.जी.रूग्णालय, मुंबई यांनी सन २०१८-२० या शैक्षणिक वर्षाकरीता २४ महिन्यांचा “एम.एस्सी.नर्सिंग” हा अभ्यासक्रम अभ्यासक्रम पूर्ण करण्यासाठी डॉ.डी.वाय.पाटील कॉलेज ऑफ नर्सिंग, नेरूळ, नवी मुंबई या खाजगी प्रवेश घेतला आहे. सदर अभ्यासक्रमास प्रवेशित होण्यास अध्ययन रजा मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन ज्ञापन :-**

“एम.एस्सी.नर्सिंग” या पदविका अभ्यासक्रमातील प्रशिक्षित झालेल्या उमेदवारांची शासनास असलेली निकड, सदर उमेदवाराने निवड केलेला अभ्यासक्रम (कालावधी २४ महिने), उमेदवाराचे वय, सदर लोकसेवक तथा अधिपरिचारिका यांनी धारण केलेल्या ज्ञानाचे अद्यावतीकरण, संवर्धन व विकास करण्यास प्रोत्साहन देणे व संदर्भ क्र.२ येथील पूरकपत्रांमधील अटी व शर्तीचे पालन करणे इ. बाबी लक्षात घेता व श्रीमती धुरी यांच्या शासकीय सेवेस ५ वर्षे पूर्ण झालेली आहेत या बाबींचा विचार करता म.ना.से. रजा नियम, १९८१ मधील नियम ८१ मधील तरतुदीनुसार “एम.एस्सी.नर्सिंग” या विषयातील पदविका अभ्यासक्रम पूर्ण त्यांना त्यांच्या नावासमोर दर्शविल्याप्रमाणे २४ महिन्यांच्या कालावधीकरिता अध्ययन रजा या शासन ज्ञापनाद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | कर्मचाऱ्याचे नाव (अधिपरिचारिका) | जन्मतारिख | नियुक्तीचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | अध्ययन रजेचा कालावधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्रीमती निता शामसुंदर धुरी | २१.०८.१९८० | ०६.११.२००८ | ३१.०८.२०३८ | दि.०३.०१.२०१८ ते दि.०२.०१.२०२० |

२. वर नमूद केलेल्या कर्मचाऱ्यांनी निवड केलेल्या **“एम.एस्सी.नर्सिंग”** या अभ्यासक्रमासाठी अध्ययन रजा मंजूरीच्या प्रयोजनार्थ म.ना.से. (रजा) नियम १९७९ नमुना ७, नियम ८३ मधील निर्धारित तरतूदीनुसार समुचित कार्यवाही करुन केलेल्या कार्यवाहीचा अनुपालनार्थ अहवाल शासनास अवगत करावा.

३. हे आदेश वित्त विभागाच्या दिनांक ०२.०६.२००३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय प्रमुखास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८०८०६१५२२४०४२१३ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHAJAN HEMANT ANANT

Digitally signed by MAHAJAN HEMANT ANANT
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education and Drug Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=18b72890e049ba3219e993bae40e4fae87fba16fd8c92cbf7f96107d9c100ae1, serialNumber=4146b85aaa58555e80c9d75a2aba23b993e46df208b0b469f1b74670dc22d7fa, cn=MAHAJAN HEMANT ANANT
Date: 2018.08.14 12:58:10 +05'30'

**( हेमंत महाजन )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल १ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. सचिव (सेवा-६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. अधिदान व कोषागार कार्यालय, मुंबई
५.जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई
६.श्रीमती निता शामसुंदर धुरी (अधिष्ठाता, सर ज.जी.समूह रूग्णालये आवार, भायखळा, मुंबई यांचे मार्फत)
७. अधिष्ठाता, परिचर्या शिक्षण संस्था, सर ज.जी.समूह रूग्णालये आवार, भायखळा, मुंबई.
८. निवड नस्ती (परिचर्या).